**शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः विक्रीसं-१११७/प्र.क्र.४२/क्रीयुसे-१,

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
तारीख: १० मार्च, २०१७

**वाचा -**

१) **शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:अनुवि-४९१६/(३२/१६)/ अर्थसंकल्प, दिनांक ०५ एप्रिल, २०१६, १२ ऑगस्ट, २०१६ व २३ नोव्हेंबर, २०१६.**

२) **उपसंचालक, शिवछत्रपती क्रीडापीठ, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे यांचे क्र.शिक्रीपी/ निमानिवि/२०१६-१७/का-११/०७०, दिनांक ०१ मार्च, २०१७ चे पत्र.**

**प्रस्तावना -**

सन १९९४ मध्ये पुणे येथे आयोजित झालेल्या राष्ट्रीय क्रीडा स्पर्धेच्या निमित्ताने पुणे येथे म्हाळूंगे-बालेवाडी गावानजीक १५१ एकर इतक्या विस्तीर्ण परीसरात शिवछत्रपती क्रीडा नगरीची निर्मिती करण्यात आली आहे. राष्ट्रीय क्रीडा स्पर्धा आयोजनानंतर सदर क्रीडानगरीचा वापर हा राज्यातील विविध स्तरावरील क्रीडा स्पर्धांचे व क्रीडा विषयक उपक्रमांचे आयोजनाकरीता करण्यात येत होता. तिसऱ्या राष्ट्रकुल युवा क्रीडा स्पर्धा सन २००८ च्या निमित्ताने शिवछत्रपती क्रीडा संकुलात असलेल्या विविध आंतरराष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सूविधांचे नुतनीकरण करण्यात आले तर कांही सुविधा नव्याने निर्माण करण्यात आलेल्या आहेत. यामध्ये प्रामुख्याने शुटींग, बॅडमिंटन, ॲथलेटिक्स, बॉक्सींग, कुस्ती, टेबल टेनिस, लॉनटेनिस, वेटलिफ्टींग, जलतरण या ९ खेळांच्या सुविधा व स्पोर्टस सायन्स सेंटर, फिटनेस सेंटर व वसतिगृहे या आनुषंगिक सुविधांची निर्मिती करण्यात आलेली आहे. तसेच पूर्वी असलेली कबड्डी, खोखो, वेलोड्रोम, फुटबॉल मैदान इ. १५ प्रकारच्या विविध सुविधा क्रीडा संकुलात आहेत. या सर्व सुविधांचा नियमितपणे वापर होत असल्यामुळे वापरामुळे सदरहू क्रीडा संकुलाच्या दैनंदिन देखभाल व दुरुस्तीबाबत वारंवार खर्च करावा लागतो. सद्य:स्थितीत येथील माहे एप्रिल, २०१६ पासूनच्या प्रलंबित वीज देयकावरील खर्च भागविण्यास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

उपरोक्त पार्श्वभूमीवर संदर्भाधिन शासन निर्णय क्र.१ अन्वये अन्वये वितरीत करण्यात आलेल्या रु.१६०.०० लक्ष निधीमधून शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे क्रीडा संकुलामधील वीज देयक अदा करण्यासाठी येणाऱ्या रु.८६,८४,३००/- इतक्या खर्चास शासन मान्यता देत आहे.

२. वित्त विभाग दिनांक २०.०४.२०१६ व दिनांक २४.०७.२०१५ च्या परिपत्रकातील तसेच संदर्भाधिन शासन निर्णय क्र.१ मधील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहंरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३ उपरोक्त संदर्भात होणारा खर्च हा " मागणी क्र. ई-३, २२०१४-क्रीडा व युवक सेवा-१०४- क्रीडा व खेळ (१६) क्रीडा संकुल (१६)(०१) क्रीडा संकुलाची स्थापना (२२०४ १७०२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याअंतर्गत त्यावर्षी केलेल्या मंजूर अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१५१२२१४४२८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.03.15 12:23:43 +05'30'

**( कि. ल. संखे )**
कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे.

३. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. सर्व जिल्हा कोषाधिकारी (संचालनालयामार्फत)
७. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
८. नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१०.ग्रंथपाल, विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
११.मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा ) यांचे खाजगी सचिव.
१२. अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा, मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती, क्रीयुसे-१.